**देवशयनी आषाढी एकादशी निमित्ताने इसबावी येथे संत पालखीचे स्वागत करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४४१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ जून, २०२३

**वाचा :-** सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.सं/३४३१, दिनांक १४ जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

पंढरपूरची वारी हा एक ऐतिहासिक व सांस्कृतिक ठेवा असून यास जवळजवळ ८०० वर्षांचा सांस्कृतिक वारसा लाभाला असून ही वारी जगभरातील मोजक्याच धार्मिक व आध्यात्मिक क्षेत्रातील एक महत्त्वाची घटना आहे. सदर वारीमध्ये राज्य व राज्यबाहेरील वारकरी-भाविक मोठ्या संख्येने कोणत्याही अपेक्षेशिवाय सहभागी होत असतात.

दरवर्षी आषाढी वारी निमित्त देहू आणि आळंदी येथून श्री संत तुकोबा महाराज आणि श्री संत ज्ञानेश्वर महाराज यांच्या नावाने दोन वेगवेगळ्या दिंड्यांचे आयोजन करण्यात येते. सदर दोन प्रमुख दिंड्या दोन मार्गाने दरवर्षी प्रवास करत असून या पालखी मार्गांवर दरवर्षी लाखो भाविक-वारकरी वारीबरोबर प्रवास करतात.

त्याच बरोबर अनेक संतांच्या पालख्या पंढरपूर कडे मार्गक्रम करीत असतात. या पालख्यांचे यथोचित स्वागत शासनाच्या वतीने मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या प्रमुख उपस्थितीत दिनांक २८ जून, २०२३ रोजी मौजे इसबावी येथे होणार असल्याने या प्रित्यर्थ होणाऱ्या कार्यक्रम व त्यावरील खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

देवशयनी आषाढी एकादशी निमित्ताने मौजे इसबावी येथे दिनांक २८ जून, २०२३ रोजी संत पालखींचे स्वागत प्रित्यर्थ होणाऱ्या कार्यक्रम आयोजन खर्च रुपये १२,६५,०००/- (अक्षरी रुपये बारा लाख पासष्ट हजार मात्र) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६२७१८२७२८८९२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASAD MAHADEV MAHAJAN

Digitally signed by PRASAD MAHADEV MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=6fcffe7574d536c6e270856345547bb470a3e70655baa82e214fc4d0cfaccaed, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B8EA3F1827AABAFA30CAEC97C98F4C9643851C3A32CFA11A13F635FC0BEA0AC3, cn=PRASAD MAHADEV MAHAJAN
Date: 2023.06.27 18:50:38 +05'30'

**( प्रसाद म. महाजन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४.